**कार्यकारी अभियंता, नाशिक पाटबंधारे नाशिक अंतर्गत लघु पाटबंधारे अन्वेषण(आदिवासी) उपविभाग, नाशिक या कार्यालयातील नियत अस्थायी व रुपांतरीत आस्थायी आस्थापनेवरील पदांना दिनांक ०१.०३.२०२४ ते दिनांक ३१.०८.२०२४ पर्यंत मुदतवाढ देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**जलसंपदा विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : मुवाढ-२०२३/प्र.क्र.१०४/२०२४)/लपा**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक :- १८/०३/२०२४

**पहावे :** १) वित्त विभागाचे शासन निर्णय क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क.,दिनांक २१.०२.२०२४

२) शासन निर्णय क्रमांक मुवाढ- २०२३/प्र.क्र.(४८६/२०२३)/लपा,दि.१९.१०.२०२३

३) अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, नाशिक यांचे पत्र जा.क्र.लाक्षेविप्राना/आ-१/७९२/२०२४, दिनांक ०५/०२/२०२४ रोजीचे

**<u>प्रस्तावना:-</u>** संदर्भ क्र.०१ चे वित्त विभागाचे शासन निर्णयान्वये सर्व प्रशासकीय विभागांना त्यांच्या आकृतीबंधात समाविष्ट असलेल्या अस्थायी पदांना तसेच, यापूर्वी आढावा मंजूर केल्यानंतर निर्माण करण्यात आलेल्या परंतु ज्यांचा समावेश आकृतीबंधात करण्यात आलेला नाही,अशा अस्तित्वात असलेल्या सर्व अस्थायी पदांना दि.०१.०३.२०२४ ते ३१.०८.२०२४ पर्यंत मुदतवाढ देण्याचे अधिकार देण्यात आले आहेत. संदर्भ क्र.२ अन्वये दि.०१.०९.२०२३ ते दि.२९.०२.२०२४ पर्यंत यापूर्वी मुदतवाढ देण्यात आली आहे.

<u>शासन निर्णय</u> : लपा कार्यासनाच्या अखत्यारितील संदर्भ क्र.०३ अन्वये प्रस्तावित केल्यानुसार अधीक्षक अभियंता व प्रशास लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, नाशिक यांचे अधिपत्याखालील कार्यकारी अभियंता नाशिक पाटबंधारे विभाग, नाशिक यांचे अंतर्गत लघु पाटबंधारे अन्वेषण (आदिवासी) उपविभाग, नाशिक या कार्यालयातील नियत आस्थायी व रुपांतरीत आस्थायी आस्थापनेवरील यांच्या कार्यालयातील २० नियत अस्थायी आस्थापनेवरील पदांना (सोबतच्या परिशिष्ट-अ प्रमाणे) दि. ०१.०३.२०२४ ते दि. ३१.०८.२०२४ पर्यंत खालील अटींच्या अधीन राहून मुदतवाढ देण्यात येत आहे.

१) रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवरील पदे सदर कर्मचारी कार्यरत असेपर्यंत चालू राहतील.

२) उपरोक्त पदे विभागाने प्रस्तावित केलेल्या कालावधीत कार्यरत असतील.

३) मुदतवाढ मंजूरी द्यावयाची नियत अस्थायी पदे विहित आकृतीबंधातील असावीत व ही पदे सहा महिन्याहून अधिक कालावधीसाठी रिक्त/व्यपगत झालेली नसतील.

४) लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, नाशिक यांचे कार्यालयाने उपलब्ध करुन दिलेल्या प्रस्तावामधील पदांची संख्या/पदामधील घट/पदामधील वाढ/सेवानिवृत्ती इ.माहिती अंतिम /अचूक आहे असे गृहित धरुन त्यांचे मागणीनुसार पदांना मुदतवाढ देण्यात येत आहे.

५) या सर्व पदांचा पुढील मुदतवाढीचा प्रस्ताव विहित प्रपत्रात प्रमाणपत्रासह विनाविलंब सादर करण्यात यावा.

या शासन निर्णयान्वये मुदतवाढ देण्यात आलेल्या पदांपैकी नियत आस्थायी आस्थापना व रुपांतरीत आस्थायी आस्थापना या पदांवरील होणारा खर्च मागणी क्र. आय-३ मुख्य लेखाशीर्ष २७०१ मोठे व मध्यम पाटबंधारे (८०) सर्वसाधारण ००१ संचालन व प्रशासन (०४) परिरक्षण आस्थापना, (योजनेतर) (०४)(१५) अधीक्षक अभियंता व प्रशासक लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, नाशिक (२७०१-ए-०२१) या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकावा व त्यामधील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

हा शासन निर्णय,वित्त विभागाच्या शासन निर्णय क्रमांक पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.२१.०२.२०२४ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारांचा वापर करुन निर्गमित करण्यांत येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२४०३१८१२५६५७६८२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

VARSHA SANDEEP BHAGAT

Digitally signed by VARSHA SANDEEP BHAGAT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT,
2.5.4.20=b200b2df2a6c4331b4a626db8cf6d32f7b30a2c5514afe21882df51ab8cdaad2, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=2711C10FA6CF7DA605799BE6228F533334F260EDEE79F096333766DAB604E021, cn=VARSHA SANDEEP BHAGAT
Date: 2024.03.18 13:06:00 +05'30'

सहपत्र : -परिशिष्ट- अ

( वर्षा भगत )
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर
२) कार्यकारी संचालक,तापी पाटबंधारे विकास महामंडळ,जळगांव
३) मुख्य अभियंता, उत्तर महाराष्ट्र प्रदेश, जलसंपदा विभाग, नाशिक
५) अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, नाशिक
६) कार्यकारी अभियंता, नाशिक पाटबंधारे विभाग, नाशिक
७) कार्यासन आ (पुर्नरचना ), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
८) कक्ष अधिकारी (अर्थ-२),जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई.
९) कार्यासन वित्त विभाग (व्यय-१२) मंत्रालय, मुंबई.
१०) कार्यासन (लपा), संग्रहार्थ.

शासन निर्णय : क्रमांक मुवाढ - २०२४/प्र.क्र.(१०४/२०२४)/लपा,जलसंपदा विभाग,मंत्रालय मुंबई .
दिनांकः- १८.०३.२०२४ चे सहपत्र

## परिशिष्ट -अ

नियत अस्थायी आस्थापनेवरील पदांना मुदतवाढ देणेबाबत.

| विभागाचे / उपविभागाचे नांव | पद | पदसंख्या |
|---|---|---|
| लघु पाटबंधारे अन्वेषण (आदिवासी) उपविभाग, नाशिक | १) उप विभागीय अभियंता | १ |
| | २) सहायक अभियंता, श्रेणी-२, शाखा अभियंता, कनिष्ठ अभियंता | ६ |
| | ३) स्थापत्य अभियांत्रिकी सहायक | ४ |
| | ४) वरिष्ठ लिपिक | १ |
| | ५) अनुरेखक | १ |
| | ६) कनिष्ठ लिपिक | २ |
| | ७) टंकलेखक | १ |
| | ८) शिपाई | २ |
| | ९) चौकीदार | १ |
| | १०) वाहन चालक | १ |
| | एकूण | २० पदे |

VARSHA SANDEEP BHAGAT

Digitally signed by VARSHA SANDEEP BHAGAT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT,
2.5.4.20=b200b2df2a6c4331b4a626db8cf6d32f7b30a2c5514afe21882df51ab8cdaad2, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=2711C10FA6CF7DA605799BE6228F533334F260EDEE79F096333766DAB604E021, cn=VARSHA SANDEEP BHAGAT
Date: 2024.03.18 13:06:23 +05'30'

( वर्षा भगत )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन